


राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्रशासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय,
३, महापालिका मार्ग,
धोबीतलीव, मुंबई – ४००००१
रजि नं. एफ १६०९४ (मुंबई)
दूरध्वनी : २२६५३९६६/ फॅक्स : २२६३१३२५
Email rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क्र./ २०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

०१ सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

०२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

०३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

०४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# काव्येतिहास-संग्रह.

भुजतरुवनच्छाया येषां निषेव्य महौजसां
जलधिरसना मेदिन्यासीदसावकुतोभया ।
स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहम्
प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नमः कविकर्मणे ॥

राजतरंगिणी.

पुस्तक. ३. सप्टेंबर. सन १८८०. अंक ९.

हें मासिक पुस्तक

पुणें पेठ शनवार, येथें

श्री शिवाजी ' छापखान्यांत छापिलें.

किंमत ८ आणे.

अनुक्रमणिका

# विषयक्रम.



अनुक्रमणिका

पात्रीं अभिषेक केला. दिव्यवस्त्रें दिव्य अलंकार घेऊन सर्व पूज्य मंडळीस नमस्कार करून सिंहासनावर बसले. कित्येक नवरत्नादिक सुवर्ण कमळें व नाना सुवर्ण फुलें वस्त्रें उदंड दिधलीं. दानपद्धतीप्रमाणें षोडश महादानें इत्यादिक दानें केलीं. सिंहासनास अष्ट खांब जाडित केले. त्या स्थानीं अष्टप्रधानांनीं उभें रहावें. पूर्वीं कृतायुगीं त्रेतायुगीं द्वापारीं कलयुगाचें ठायीं पुण्य श्लोक राजे सिंहासनीं बैसले. त्या पद्धतीप्रमाणें शास्त्रोक्त सर्व ही साहित्य सिद्ध केलें. अष्टखांबीं अष्टप्रधान उभे राहिले. त्यांचीं नांवें. बितपशील.:—

१ मोरोपंत त्रिंबक पंताचे पुत्र, पेशवे, मुख्यप्रधान.

१ नारो निळकंठ व रामचंद्र निळकंठ मुजुमदार यांचे नांव अमात्य.

१ रावजी पण्डितराव होते त्याचे पुत्रास रायजीराज.

१ हंबीरराव मोहिते सेनापति.

१ [illegible]पंत व निराजीपंत वाक[illegible] यांचें नांव मंत्री.

१ [illegible]जी सोनदेव डबीर यांचे पुत्र रा[illegible]

१ अ[illegible] नांव सचिव.

१ निराजी रावजी[12] यांस [illegible] धिशी.

येणेंप्रमाणें संस्कृत नांवें ठेविलीं. अष्ट प्रधानांचीं नांवें ठेविली ते स्थळें नेमून उभे केले. आपले स्थळीं उभे राहिले. बाळ प्रभु चिटनीस व न[illegible] नीस वरकड अष्ट प्रधानांचे मुतालिक व हुजरे प्रतिष्ठित सर्वही प्रमाणें सर्वही उभे राहिले. छत्र जडावाचें मोतीलग झालरीचें धरिलें. छत्रपति असें नांव चालविलें. कागदीं पत्रीं स्वस्ति श्री बसले त्या दिवसापासून नियत चालविला. पन्नास सहस्र मिळाले. या वेगळे तपोनिधी व सत्पुरुष, संन्यासी, अ[illegible] जटाधारी, जोगी, जंगम नानाजाती मिळाले. तितक्यांस चार मास अन्न [13]उनफे चालविलें. निरोप देतां पात्र पाहून द्रव्य, अलंकार, भूषणें, वस्त्रें अमर्याद दिधलीं. गागाभट मुख्य अध्वर्यु त्यास अपरमित द्रव्य दिलें. संपूर्ण खर्चाची संख्या एक क्रोड बेताळीस लक्ष होन झाले. अष्ट प्रधानांस

---

४. 'केलीं' म० प्र०

५. 'स्तंभीं' म० प०

६. 'मोरो त्रिंबक पेशवे मुख्य प्रधान' म० प०

७ 'दत्ताजी त्रिंबक वाकनीस' म० प्र०

८. 'मोरो' म० प्र०

९. 'त्रिंबक सोनदेव होते त्यांचे पुत्र रामचंद्रपंत डबीर' म० प्र०

१० 'अनाजी दत्तो' म० प्र०

११ 'रघुनाथ पंडितराव त्यांचे पुत्र दानाध्यक्ष, म० प्र०

१२ 'निराजी रावजी हे न्यायाधीश' म० प्र०

१३. 'उलफा' ?

लक्ष लक्ष होन बक्षीस दर असामीस, त्या खेरीज एक एक हत्ती, घोडा, वस्त्रें, अलंकार असें देणें दिलें. येणेंप्रमाणें राजे सिंहासनारूढ झाले. या युगीं सर्व पृथ्वीवर म्लेंच्छ बादशाह. मऱ्हाटा पातशाह येवढा छत्रपति झाला. ही गोष्ट कांहीं सामान्य झाली नाहीं.

हीं वर्तमानें बाहादूरखान कोके[१४] यांशीं कळलें. त्यानें पुढें पेडेंगांव[१५] भीमातीर येथें येऊन छावण्या केल्या. आणि दिल्लीस पातशाहास हें वर्तमान सिंहासनाचें लिहिलें. पातशाहास कळून पातशाह तक्तावरून उतरून अंतःपुरांत गेले. आणि दोन्ही हातभुईस घांसून आपले देवाचें नांव घेऊन परम खेद केला. दोन दिवस अन्न उदक घेतलें नाहीं. आणि बोलिले कीं, "खुदानें मुसलमानाची पादशाई दूर करून तक्त बुडवून मराठियास तक्त दिलें. आतां हद्द झाली." असो, बहुत खेद दुःखाचे पर्वत मानिले. मग मोठे मोठे वजिरांनीं नाना प्रकारें समाधान करून [illegible]णा खुणा घालून तक्तावर बसविलें. ऐसेंच विजापूरचे पातशाहास व भागानगरचे पातशाहास वरकड सर्वांस वर्तमानें कळून खेद जाहला. रूम-शाम, इराण, तुराण व दर्यांतिल पातशाहांस[१६] खबर कळोन मनांत खेद करूं लागले. खेद करून आशंका मानिली. येजातीचें वर्तमान जाहलें.

पुढें राजे तक्तीं बसून राज्यभार करूं लागले. निजामशाही देश [illegible] व मोंगलाई ही जप्त केली. भागानगरच्या पादशहांनीं रा-[illegible] करून निराजीपंताचे पुत्र प्रल्हादपंत मोठे बुद्धिवंत यांस हेजि-[illegible] घेऊन, करभार राजियास देऊन स्नेहांत मिळाले. वरकड [illegible] राज्यें होतीं तीं घेतलीं. कितीएकांनीं करभार देऊन अंकित [illegible]ले. तुंगभद्र देशापासून कावेरीपर्यंत कर्नाटक साधावें, हा हेत मनात [illegible]रेला. त्यास लष्कर पाठवून साधावें तरि दिवसगतीवर पडतें. म्हणून खुद्द राजियानीं आपण जावें असें केलें. त्यास पेडेंगांवीं[१७] बाहादूरखान गनीम पाठीवर येईल म्हणून निराजीपंत न्यायाधीश पाठविले. कित्येक द्रव्य अलंकार रत्नखचित पाठविलीं. त्यास अंतरंगें सख्य एक वर्षपर्यंत आपणास कर्नाटक साधावयास लागेल. तुम्हीं राज्यास उपद्रव न करणें असें त्यास सांगून ठायीं ठेविलें, आणि कर्नाटकास जावयास समागमें निव-

---

१४. मागें पृ० ६३ व पृ० ६७ पहा.

१५. 'भुदुगलें' म० प्र०

१६. दर्यांतील बादशाह म्हणजे 'युरोपियन लोक.' या दर्यांतील बादशाह्या २७ किंवा २२ होत्या असें मानीत असत. मागें पृ० ५६ पहा.

१७. येथें 'गोदडगांव' असा म० प्र० पाठ आहे.

डून पागे पतके पंचवीस हजार स्वार व सरकारकून रघुनाथ नारायण व जनार्दन नारायण हे कर्नाटकचे माहीतगार यांस बरोबर घेतले. वरकड पेशवे व मुरनीस व वाकनीस वरकड लष्कर राज्यास रक्षणास ठेविलें. आणि विचार केला कीं, "कर्नाटक साधावयास द्रव्य लागेल त्यास खजिन्यांतील द्रव्य वेंचूं नये. नूतन मिळवावें आणि वेंच करून देश साधावा." असा विचार करितां भागानगरची पातशाहींत द्रव्य उदंड आहे. तेथें निष्ठुरता करून द्रव्य मेळवावें तरि वर्षास करभार भागानगरकर देतात. तेथें निष्ठुरता करूं नये. सख्य करून त्यांची भेट घ्यावी. भेटी नंतर सर्वही अनुकूळ करून देतील. असा विचार करून भागानगरीं प्रल्हादपंत हेजीब राजियाचे होतें. त्यांसि हें वर्तमान लिहून भेट घ्यावी हा विचार केला. तानशाई[18] पातशहा भागानगरकर यांनीं मनांत बहुत शंकाधरिली कीं, जैसा अबझुलखान बुडविला, कीं शास्ताखान बुडविला, दिल्लीस जाऊन अलमगिर पातशहास पराक्रम दाखविला, ऐसा येखादा अनर्थ जाहाला तर काय करावें ? भेट मात्र राजियाची न घ्यावी. जें मागतील तें देऊं" असें बोलिला. मग पातशहाशीं व अकंणापंत व मादंणापंत कारभारी यांशीं प्रल्हादपंतें आण, शपत, क्रिया बहुत दिधल्या. अपाय नाहीं. स्नेहाची [illegible] होऊन जातील, अशी बळकटी केली.

येणेंप्रमाणें राजियाशीं वटाई केली. उभयतांच्या भेटी
करून मग राजे मजल दरमजल लष्कर घेऊन भागानगरास[19]
नगरची विलांयत[20] लागल्यावर ताकीद केली. एक काडी
न व्हावी ऐसें केलें. कित्येक गर्दांना मारून जाबेता[21] बसवि
लीस जाऊन तेथें खुष खरेदी सर्व पदार्थ घेऊन चालिले.
जातां पुढें पातशहास खबर कळून बहुत संतुष्ट जाहला. [illegible]
चार गांव सामोरे यावें असें केलें. राजा मोठा साधक, आप[illegible] घा[illegible]
शहास सांगून पाठविलें कीं, "तुम्हीं न येणें. आपण वडील भाऊ
धाकटा भाऊ. आपण पुढें न यावें." असें सांगून पाठविल्यावरि पातश[illegible]
बहुत संतुष्ट जाहले. आणि मादंणापंत व अकंणापंत म्हणजे वजया [ [illegible]
पातशाह. सर्व पातशाही धणी. मादंणापंत हे उभयतां पुढें येऊन राजि[illegible]
यास घेऊन शहरास गेले. राजियांनीं आपले लष्करास कुल जरी सामान

---

१८. 'तानाशहा' पाठांतर

१९. म्हणजे 'हैदराबाद'.

२०. विलायत=मूळ देश—भागानगरचा मुलुख

२१. जाबता = धाक.

केलाच होता. सुमुहूर्त पाहून पातशाहाचे भेटीस नगरामध्यें चालिले. पातशाहांनीं कुल नगर शृंगारिलें. चौफेरी बिदीस कुंकुम केशराचे सडे रंगमाळा घातल्या. गुढिया, तोरणें पताका निशाणे नगरांत लाविलीं. नगर नागरिकलोक कोट्यानकोटी राजा पहावयास उभे राहिले. नारींनीं मंगळ अर्घ्या अगणित उजळून राजियास वंदिलें. सोनें रुपियाचीं फुलें राजियांवरि[२२] उधळलीं. राजियांनीं लोकांस खैरात द्रव्यवस्त्रें अगणित दिलीं आणि सर्व सैन्यासहित इद महालास पावले. पातशहास " खालते उतरूं नका, आपण खासा येतों " ह्मणून शफत घालून सांगून पाठविलें. पातशाहा महालावरि राहिले. राजियांनीं आपलें लष्करचे लोक कंबरबंदी करून महालाखालीं[२३] बसविले आणि शिडीवरून चालिले. खासा राजा व जनार्दन नारायण व प्रल्हादपंत व सोनाजी नाईक दौलतबंकी[२४] व बाळाजी ढंढेरे[२५] पांचजण चढले. महालांत गेले. पातशहा पुढें येऊन क्षेम आलिंगन केलें. उभयतां एकासनीं बसले. मादंणापंत व अकंणापंत व जनार्दनपंत, प्रल्हादपंत, सोनाजी नाईक बंकी व बाबाजी ढंढेरे असे होते. पातशहा व राजे व मादंणापंत त्रिवर्ग बसले. वरकड उभे राहिले. उभयतांचा स्नेह अतिशय बोलणें झालें. पातशहाच्या स्त्रिया झरोकियांतन जाळपैलांतून[२६] राजा पाहतां बहुत थक्क ज्राहल्या. पातशहाही बहुत एक प्रहर बसून राजियाच्या पराक्रमाच्या गोष्टी ऐकिल्या. ार रत्नजडित व वस्त्रें हत्ती, घोडे राजियास व राजियाकडील देऊन निरोप दिला. राजे व पादशहा महालाखालीं येऊन थळास चालिले.

रघुनाथपंत[२७] व हंबीरराव वरकड सरदार लष्कर ठेविले होते घेऊन आपले जागियास आले. मार्गीं येतां नगर लोकांस राजे उठोन गेलियावरि पातशहाचें समाधान झालें कीं, राजा ाणेक, आपल्यास रक्षिलें क्रिया जतन केली. ऐसें आश्चर्य मानून ल्हाद पंतास कित्येक बाक्षिसें पातशहानीं दिलीं कीं, तुम्ही प्रमाणीक ह्मणून वाजून राजियाकडे पाठविलें. दुसरे दिवशीं मादंणापंतीं राजियास आले घरास मेहेमानीस[२८] नेलें. आणि आपले मातोश्रीचे हातीं पाक सिद्ध

२२. ' पुष्पें वलायत दूर केली ' म० प्र०

२३. ' जिन्या खालीं ' म० प्र०

२४. ' दौलद्बंकी महाद्वारपाल इत्यभिधीयते' रा० व्य० को० महाड प्रतीचा पाठ ' सोमाजी नाईक हकीम ' असा आहे.

२५. ' बाजी ढासरे ' म० प्र०

२६. ' जाळ्या लावून ' म० प्र०

२७. ' रघुनाथ नारायण हणमंते ' म० प्र०

२८. मेहमानी = पाहुणचार. ' मेहमानी तु आतिथ्यं ' रा० व्य० को०

करून मादंणापंत व अकंणापंत जवळ बसून राजियास भोजन घातलें. वरकड राजियाकडील समुदाय होता त्यास ही भोजनास घातलें. आणि अलंकार वस्त्रें हत्ती घोडीं देऊन स्थळास पोहोंचाविलें. पातशहानीं मादंणापंतास बोलावून नेऊन विचारलें कीं, "राजियास काय पाहिजे तें देऊन राजियास संतुष्ट करून निरोप द्यावा." असा विचार करून सुमुहूर्त पाहून भागती राजे भेटीस आणिले. आणि जड जवाहीर रत्नाचे अलंकार हत्ती घोडे अपरमित दिधलें. कुल सरकारकुन व हंबीरराव वरकड सरदार यांचे मुजरे महालावरि उभयतां छत्रपति बैसून मुजरे घेऊन सरदारांचे पराक्रम नांव पाहून सर्वांस अलंकार वस्त्रें हत्ती, घोडे, मनुष्य पाहून दिधलें. आणि पातशहा बोलिले कीं, "सर्वां प्रसंगीं आपणांस तुह्मीं सहाय असावें." ऐशीं बळकटी करून राजियाची आण शपत घेऊन निरोप दिला. प्रतिवर्षीं कारभार जो देणें तें येणेंप्रमाणें देऊन प्रल्हादपंत नेहमीं आपणा जवळ ठेऊन आमचे ?जबतीनें आपणाजवळ असों देणे, ऐसें बोलिले. राजे आपले स्थळास ?ले

?ा उपरी राजियास भागानगरचे मोठमोठ्या सरदारांनीं मेहमान्या केल्या. ?क महिनाभर भागानगरीं होते. तेथील द्रव्य वस्तभाव घेऊन चंदीकडे ?ुदाय घेऊन चालिले. मग श्रीशैल्यास आले. नीळगंगेचें स्नान श्रीचें दर्शन झालें. तीर्थविधी झाला. राजियानीं स्थळ देखोन परम ?झाला कीं, केवळ कैलास दुसरें, असें स्थळ वाटलें. तेथें हें देह ?ास अर्पण करावें. शिरकमल वाहावें. ऐसें योजिलें तें समयीं श्रीभवानी अंगांत आविर्भवली आणि बोलली जे, "तुज ये गोष्टी मोक्ष नाहीं. हें कर्म करूं नको. पुढें कर्तव्यही उदंड तुझें हातें करणें आहे" असें सांगून श्री गेली. हें वर्तमान सावध झाल्यावरि राजियास कारकुनांनीं सांगितलें. मग श्रीस शिरकमल वाहावें हा विचार राहिला.

पुढें कर्नाटकचा देश साधावा म्हणोन चंदीस वेढा घातला. चंदीमध्यें खानखान विजापुरकराचा वजीर याचे पुत्र रुपलखान व नौसरीखान हे उभयतां होते. त्यास काज कारण करून, त्यास कौल देऊन, बाहेर काढिले. आणि स्थळ साध्य केलें. त्रिवांदि[3] महाल म्हणून आहे तेथें शेरखान विजापूरचा वजीर पांचहजार स्वारांनिशीं होता. पठाण तालेदार, हत्ती सामान द्रव्य अगणित होतें. तो राजावर चालून आला त्याशीं युद्ध करून त्यास

---

२९. 'रुदल्लखान व नासीर महमदखान' म० प्र०

३०. 'त्रेमलया' म० प्र०

बुडविला. जिवंत खासा शेरखान धरिला. पांचहजार घोडे, व बारा हत्ती पाडाव केले. द्रव्य, जवाहीरही अपार हस्तगत झालें. मोठें युद्ध केलें असें कर्म [31] झालें.

त्या उपरीं राजेश्री व्यंकाजी राजे धाकटे भाऊ राजियाचे यांनीं चंदावरचें राज्य साध्य करून राज्य करीत असत. त्यांनीं आपले कारकून होते ते समागमें घेऊन राजियाचे भेटीस आले. भेट बंधू बंधूंची झाली. एकाजी राजाचे कारकून काकाजी पंत पेशवे भेटले व कोन्हेर महादेव मुजुमदार भेटले. जगंनाथ पंत, व्यंकाजी दत्तोचे पुत्र सर्व सैन्य भेटलें. व भिवजी राजे व प्रतापजी राजे [32] नाटकशालेचे पुत्र महाराजाचे होते. तेही भेटले. बहुत संतोष झाला. उभयतां बंधूची मेहमानी परस्परें झाली. देणेंही उभयतांनीं उदंड दिलें. आठ दिवस एकत्र होते. मग राजियानीं व्यंकाजी राजे यासि प्रश्न केला कीं, "महाराज तुमचे आमचे पिते आपण त्याजकडून निरोप घेऊन पुण्याकडे जाऊन येवढें राज्य साधिलें. कीर्त केली. ऐशियाशीं वडिलांची बारा बिरदें तुह्मांजवळ आहेत तीं तुम्ही चालवीतच आहां. ऐशियास आपण वडील पुत्र आणि पराक्रमी तुम्हांहून पराक्रम विशेष केला. बारा बिरदें मात्र तुम्हांजवळ आहेत तीं आपणास देणे. आपण चालवूं. नवीं बिरदें करावयाची काय आशंका आहे? परंतु वडिलांची हातचीं आहेत तेवढी आपणाजवळ असावीं म्हणून मागितलीं." त्याजवरून त्यानें विकल्प चित्तांत आणून दिलीं नाहींत. त्याजवर एकाजी राजे यांच्या कारकुनानीं व कारभारी यांनीं त्याचे पोटांत भय घातलें कीं, राजे तुह्मांशीं खटखट करून बिरदें जोरावारीनें घेतील असें सांगून त्यास धास्त उत्पन्न करून रात्रिचे वेळेस व्यंकाजी राजे पळून चंदावरीस बिरदें घेऊन गेले.

त्यास दुसरे दिवशीं राजियास वर्तमान कळलें कीं, व्यंकाजी राजे पळून गेले. त्याजवरून आश्चर्य केलें कीं, "काय निमित्य पळाले ? आह्मी त्यास धरीत होतों कीं काय ? आम्हांस बिरदें काय करावयाचीं ? आमचीं बिरदें अष्ट दिशेस लागलीं आहेत. समुद्रवलयांकित भूमंडळीं कीर्त आपली झाली आहे. तेथें बिरदें काय करावयाचीं ? वडलांची वस्त असावी म्हणून मागितलीं होतीं. पळावयाचें नव्हतें. द्यावयाचीं नव्हतीं तरि न देणें. उगेच उठून पळून गेले. अति धाकटे ते धाकटे, बुद्धिही धाकटेपणा योग्य केली." असें बो-

31. 'असें कर्म करून निमल महाल फत्ते केला.' म० प्र०

32. वेश्या, उपस्त्रिया. (शाहजीच्या)

लिले. मग त्यांचे कारकून व सरदार पळत होते ते राजियाच्या लोकांस सांपडले, त्यांस धरून आणिलें. मग ह्या अवधियांस वस्त्रें, भूषणें, अश्व देऊन चंदावरास बंधूसंन्निद्ध पाठाविलें. संताजी राजे ह्मणून महाराजाचे नाटकशाळेचे पुत्र होते. ते शूर पराक्रमी होते. ते राजियाच्या भेटीस आले. भेट झाली. त्यास करनाटकांत हजार घोड्यांची दौलत दिधली. महाल मोकाशे दिले. हत्ती, घोडे, वस्त्रें देऊन रवाना केले. आणि येलूर[३३]कोट यामध्यें इदलशाई ठाणें होतें. तो कोट म्हणजे पृथ्वीवर दुसरा गड असा नाहीं. कोटांत जीत पाणियाचा खंदक. पाणियास अंत नाहीं असें. उदकांत दहा हजार सुसरी. कोटाचे फांजियावरून[३४] दोन गाडिया जोडून जावें ऐशी मजबुदी. पैंडेकोट[३५] तरि चार चार फेरियावरि फेरे. ये जातीचा कोट. त्या कोटास वेढा घालून कोट घेतला. वरकड हीं जागां जागां गढी कोट घेतले. कित्येक नवे वसविले. असे शंभर कोट त्या प्रांतीं केले. वीस[३६] लक्ष होनाचें राज्य साध्य केलें. चंदी ह्मणजे जैसें विजापूर, भागानगर, तैसाच तक्ताचा जागा. येथें राजियानीं रहावें. परंतु इकडेही राज्य उदंड. त्याचें संरक्षण झालें पाहिजे. याजकरितां चंदीस रघुनाथ नारायण ब्राह्मण त्यास मजमू संपूर्ण राज्याची सांगितली, आणि त्यास तो प्रांत स्वाधीन करून चंदीस ठेविलें. त्यापाशीं तूर्त फौज असावी ह्मणून हंबीरराव सेनापति सेनेसहीत ठेविले. आणि राजियानीं आनंदराव व मानाजी मोरे हे दोघे सरदार फौजेनिशीं बराबर घेऊन चंदीहून निघाले. घाट चढून वरतें आले. कोल्हार, बाळापूर हे कोट घेतले. देश काबीज केले. कित्येक गड वसविले. पुढें पाळेगार मारून गर्दीस मिळविले. त्या प्रांतीं रंगो नारायण म्हणून कारकून सरसुभेदार ठेविले. तो ही प्रांत रघुनाथ पंताचे स्वाधीन केला. कोल्हार प्रांते मानाजी मोरे सरदार फौजेनिशीं ठेविले. आनंदराव राजियानीं बराबर घेऊन कोपळास आले. तेथून लक्ष्मेश्वरास[३७] आले. तेथून मजल दरमजल संपगांव प्रांतीं आले. बलवाडा म्हणून कोट होता. तेथें देसाईण बायको होती. तिनें राजियाचें लष्करचे कहीकाबाडी[३८] बैल नेले. हें वर्तमान राजियास कळलें. बलवाडास वेढा घातला, कोट घेऊन देसाईण धरिली. तीस शिक्षा केली. मग पुढें पन्हाळियास आ-

३३. 'बंगरूळच्या' म० प्र०

३४. 'सफेली म० प्र० 'प्राकारवेदिका फांजि' रा० व्य० को०

३५ 'पडकोठस्तथासाद्विः प्राकारवलयं स्मृतं' रा० व्य० को०

३६. 'बारा लक्ष' म० प्र०

३७. याच्या पुढें 'लक्ष्मेश्वरचा किल्ला वेढा घालून घेतला. खान गौडा देसाई यास धरून शिक्षा केली.' असें म० प्र०

३८. 'कहीकाबाडी = लाकूडफाटें, दाणा वैरण नेणारे.



अनुक्रमणिका

ले, आणि राजियाचाही परामृष[39] केला. मग राजे आले हें वृत्त सर्वांस कळलें. त्याजवरून निराजीपंत बहादुरखानाजवळ ठेविले होते, तेही दर्शनास आले. व खानानींही जड जवाहीर, वस्त्रे राजियाशिं पाठविली.

त्या उपरी, कर्णाटकांत हंबीरराव फौजेनिशीं व रघुनाथ नारायण ठेविले होते हें वर्तमान व्यंकाजी राजे यास कळोन राजियांनीं आपली फौज व पाळेगाराची फौज मिळविली. आणि हंबीरराव यावरि चालून आले. ते समयीं हंबीरराव याचे चौगुणी घोडा राऊत हशम अगणित व्यंकाजी राजे यांचे होते. मग यांस त्यांस युद्ध झाले. मग राजियाचा पुण्यप्रभाव अधिक आणि भाग्योदय, हंबीरराव यानीं व्यंकाजी राजियाची फौज मोडिली. मोठें युद्ध जाहलें. अगणित रण पडलें. आणि व्यंकाजी राजियाचे चार हजार घोडे पाडाव केले. व हत्ती जड जव्हाहीर बाजे सरदार भिवजीराजे व प्रतापजी राजे वरकड ही नामांकित लोक पाडाव केले. अशी फत्ते केली. यश आलें आणि पाडाव केले सरदारांस वस्त्रे देऊन सोडिले. यावरि रघुनाथपंत व हंबीरराव चालोन चंदावराकडे गेले. मग व्यंकाजी राजे यांनीं सभ्य मनुष्य मध्यस्त घालून सख्य करावें असें झालें. त्याजवर रघुनाथपंतीं व हंबीररायांनीं राजियाकडे जासूदपत्रें देऊन पाठविले मग राजियास वर्तमान कळोन या उभयतांस उत्तर पाठविलें कीं, व्यंकाजी राजे आपले धाकटे बंधु आहेत. मूलबुद्धि केली. त्यास तोही आपला भाऊ त्यास रक्षणें. त्याचें राज्य बुडवूं नका. अशीं उत्तरें आलियावरि उभयतांनीं व्यंकाजी राजे यांशीं सल्ला केला. आणि द्रव्य ही उदंड घेतलें. मग रघुनाथपंतीं हंबीरराव यास लष्कर सहवर्तमान निरोप देऊन राजियाकडे पाठविलें. आणि रघुनाथपंत आपण तिकडे कर्नाटकांत फौज दहाहजार स्वार व पागा व शिलेदार जमाकरून तें राज्य रखून राहिले. हंबीरराव याची व राजियाची भेट जाहाली. कित्येक नांवाजिले. बक्षिसें दिलीं. आणि पुढें खासा राजियांनीं अवघें लष्कर घेऊन जालनापूर मोंगलाईंत त्यास वेढा घातला. पेठा मारिल्या. शहर लुटून फन्ना केलें. अगणित द्रव्य, सोनें रुपें, जड जव्हाहीर, कापड, घोडे, हत्ती, उंटें फस्त केलीं. मोंगलाच्या फौजा, रणमस्तखान व केशरसिंग, बडा, व लष्करखान[41] व बाजेउमराव अशा फौजा पंचवीस तीस हजार चालून आले. त्यांशीं व राजियाचे

---

३९. 'परामर्ष' हा शब्द असा पूर्वीं लिहीत असत.

४० मागें पृ० ६३ व ६७ पहा.

४१. 'सरदारखान' सा० प्र०

अनुक्रमणिका

ने असावेत, ते तेथें आपण करावेत. रा छ ९ माहे रमजान बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती. लेखनसीमा.

[ ४ ] श्री

राघोबादादांनीं साबाजी भोंसले यास फोडून आपल्याकडे सामील होण्याकरितां कलमबंदी लिहून या प्रकारें दिली. नकल:—

१ आमचे घरचे चाकरांनीं मोंगल मेळवून खूळ आरंभिलें आहे त्यांतून तुम्हीं निघोन लवकर हरवक्त आह्मापाशीं यावें........................कलम.

२ घरचे चाकर यांचा व मोंगलांचा बंदोबस्त जसा आमचे सेवकास सोयीस बनेल तसा करावा. त्या कामास सर्वात्मना अकृत्रिमपणें आमचे मनोदयानुरूप अनुकूळ असावें. तिळप्राय कसूर कोणेविशींही करूं नये. ............... कलम

सदर्हू दोन कलमांप्रमाणें अमलांत यावें. आह्मांकडून आपला गौरव या प्रमाणें होईल. तपशील:—

१ सेनासाहेबसुभा बमौजीब[1] दौलत सांप्रत जशी ज्याचे नांवें आहे तशी असावी असें तुह्मास प्रशस्त असल्यास, आहे तसेंच असेल. हें जर तुमचे चित्तास न ये, तुमचेच नांवें पद व दौलत असावी असें असल्यास, तुमचेच नांवें पद दौलतसह करून देऊं. यांत तुह्मांस जसें आवडेल तसें करूं....... कलम.

२ तुमचा उपयोग हल्लींही हरवक्त पडावा व पुढेंही हमेषा असावा सबब तुह्मांस महाल जहागीर एकूण बेरीज तनख्याची ३२ लक्ष रुपयांची बावचाचा करार केला असे. सदर्हू बेरिजेचे महाल क्षेपनिक्षेप[3] देऊं. येणें प्रमाणें पेशजीं प्रमाणें ३२ चा करार........ कलम.

३ पेशजींचे कराराप्रमाणें किल्ले आशेरी ही जागा तुह्मांस देऊं. येणेंप्रमाणें करार... कलम.

छ ५ माहे मोहरम सुम आरबा सबैन चैत्रमास मुक्काम कुडची करनाटक प्रान्त नजीक कृष्णा दक्षिणतीर. फसली ११८३.

[ ५ ] श्री

राजेश्री व्यंकोजी[4] भोंसले सेना धुरंधर गोसावी यांस सकळ गुणालंकरण

---

१ ही इ० सन १७७३ त झाली.
२ प्रमाणें, अनुसरून.
३ खचीत, अवश्य, निश्चयें करून.
४ हा मुधोजीचा कनिष्ठ पुत्र. याचा जन्म चन्द्रपूर येथें शके १६९८ श्रावण वद्य द्वादशी सोमवारीं झाला. यास "मन्याबापु नाना साहेब" असें म्हणत. आरगांव येथें इ. स. १८०३ मध्यें जें युद्ध संग्राम झाला त्यांत मराठ्यांच्या सैन्याचें-आधिपत्य या

(पुढें चालू.)

अनुक्रमणिका

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित माधवराव नारायण पंत प्रधान आशीर्वाद उपरी येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लिहीत जावें. विशेष राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा पुण्यास आले. भेटी झाल्या. मुधोजी भोंसले कैलासवासी झाले याजकारितां सेनाधुरंधरीचें पद त्यांचे नांवें होतें तें तुमचे नांवें सरकारांतून करार करून दिलें पाहिजे ह्मणून बोलले. त्याजवरून सेनाधुरंधरीचें पद तुमचे नांवें करार करून पदाचीं वस्त्रें व जवाहीर व हत्ती व शिक्के कटार पाठविली असे. आलाहिदा याद आहे त्याप्रमाणें घ्यावी, आणि मुधोजी भोंसले यांजकडेस सरंजाम चालत आला आहे त्याप्रमाणें बंदोबस्त करून सरकार लक्षांत राहून सेवा एकनिष्ठपणें करून सेनासाहेब सुभ्याचे लक्षा प्रमाणें वर्तणूक करावी. रा छ १४ माहे साबान सुमतिसा समानीन मयातैनअलफ; बहुत काय लिहिणें हे विनंती. लेखनसीमा.

[ ६ ] श्री

राजश्री जानोजी भोंसले सेनासाहेबसुभा गोसावी यांस सकळ गुणाळंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित माधवराव बल्लाळ पंत प्रधान आशीर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशळ ल्याहावें. विशेष आपण कितीएक प्रकारें तीर्थरूप कैलासवासी यांचे वेळेस निखालस वर्तलेत या अलीकडे कालगतीनें दरम्यान न व्हावयाच्या गोष्टी झाल्या. त्यास सांप्रत सर्व प्रकारें निखालस वर्तावें व या दवलतीचें कल्याण इच्छावें; या अर्था वरून संतोष झाला. त्यास तुह्मी तरी सर्व प्रकारें या दवलतीचें उत्तम तेंच इच्छावें, काडीमात्र दुसरा भाव नसावा, व येथून तिळतुल्य आपणा विषयीं दुसरा विचार नाहीं. सर्व प्रकारें निखालसतीनें असावें. याशीं अंतर होणार नाहीं. याज विषयीं आपणही शपतपूर्वक पत्र पाठविलें त्याप्रमाणें

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )
जवळ होतें. हा काशी क्षेत्रीं फसली १२२१ साली श्रावण मासीं मरण पावला. पुढें मसनदीस आलेला मुधोजी उर्फ आपा साहेब हा याचाच पुत्र.

१ मुधोजी नागपूर मुक्कामीं इ. स. १७७८ फसली ११९७ वैशाख शुद्ध १५ स मरण पावला. नंतर फसली ११९८ मार्गशीर्ष मासीं रघोजी मंत्रिमंडळासह नागपुराहून निघोन माघ मासीं पुण्यास आला. तेथें वैशाख मासीं पेशव्याशीं तहनामा होऊन श्रावण मासीं नागपुरास येऊन दाखल झाला.

२ "सेनाधुरंधर" हा किताब प्रथम मुधोजीस स. १७७५ त मिळाला.

३ बाळाजी बाजीराव उर्फ नाना साहेब.

४ जानोजीनें निजाम अली बरोबर सख्य करून पेशवा होण्याचा घाट घातला, पुणें शहरास स. १७६३ त आग लाविली, राघोबा दादाशीं स्नेह ठेवून पेशव्याच्या विरुद्ध वर्तन ठेविलें व पुढें स. १७६८
(पुढें चालू)

चालावें येथूनही ऐसेंच वर्तण्यांत येईल. यास तीर्थरूप कैलासवासी नानासाहेबांची शपथ असे व श्री गजाननीची शपथ असे. जैसे निष्टेनें वर्ताल तैसेच तुमचे दवलतीची अभिवृद्धि करण्यांत येईल. वस्कड मजकूर हे[२] सांगतील त्याज वरून कळेल. छ २७ माहे सवाल बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती. लेखनसीमा.

[ ७ ] श्री

राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा गोसावी यांस.

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य...... स्नेहांकित माधवराव नारायण पंतप्रधान आशीर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असलें पाहिजे. विशेष श्रीमंत महाराज छत्रपति स्वामी यांचे आज्ञे वरून तुह्मांस सेनासाहेबसुभा पद बहाल केलें असे, तरि तुह्मी फौजेचा व मुलुखाचा बंदोबस्त करून चाकरी सरकारची एकनिष्टपणें करीत जावी. रा छ. २९ माहे सनेर सुमसिन सबैनमया अलफ. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती. लेखनसीमा "राजाराम नरपति हर्षनिधान माधवराव नारायण मुख्य प्रधान".

[ ८ ] जरीपटका मिळाला.

रघोजी भोंसले उर्फ बाबासाहेब यांजला शाहूमहाराजांनीं सेनासाहेब सुभ्याचें पद व शिक्के कटार वस्त्रें वगैरे मरतैबा दिला ते वेळेस रघोजी भोंसले यांणीं महाजांस विनंती केली कीं आम्ही कर्नाटकचे मोहिमेवर गेलों होतों तिकडेस एका महापुरुषानें आह्मांस श्री रामचंद्र स्वामीची मूर्ति प्रसाद दिली. त्या वेळेस त्या सत्पुरुषाची वाणी झाली कीं या मूर्तीची आराधना करून सेवा करणें ह्मणजे तुमचे कल्याण होईल व देवाची पताका ही आह्मांजवळ आहे. या योगानें महाराज कृपावंत होऊन हें पद ते दिवसा पासून दिलें त्यास आमचे मनांत वासना आहे कीं श्री रामचंद्राचे नांवानें झेंडा उभारून चालवावा; या विषयीं महाराजांची आज्ञा असावी. यावरून महाराजांनीं आज्ञा केली कीं आम्हीही रामभक्तच आहों व आमचा

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू ) त पुण्यावर स्वारी केली; इत्यादिक नाना साहेबांच्या मरणा नंतर झालेल्या गोष्टी होत.

१ माधवराव पेशवा गणपतिभक्त होता अशी प्रसिद्धि आहे.

२ हें पत्र कोणाकडेस पाठविलें याचा पत्ता लागत नाहीं.

३ राजाराम.

४ सन्मानाचीं व हुद्याचीं भूषणें.

५ ही स्वारी इ. स. १७२७ सालची असावी.

अनुक्रमणिका

झेंडा भगवा रामदास स्वामीचाच आहे. त्यास तुह्मीही भगवा झेंडा करून जरीचा पटका येथील प्रमाणें लावावा, व हा सरदाराचा शिरस्ताही आहे कीं जयाचा झेंडा करावा हें समजून महाराजांनीं कृपावंत होऊन सदरीं लिहिल्या प्रमाणें आज्ञा करून विडे दिले. त्या हुकमाप्रमाणें तेथेंच जरी-पटका तयार करून समागमें घेऊन वराड प्रांतीं आले.

[ ९ ] श्री

सकळ गुणालंकरण अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री राघोजी भोंसले सेना साहेब सुभा

सेवेशीं फत्तेसिंग भोंसले रामराम विनंति उपरि, तुह्मीं आपल्या समागमें फौजेनें शिकस्त मेहनत केली, तुमचे पदरीं फौजेस सरंजाम बेगमीचा नाहीं, याज करितां तुह्मांस सरंजाम देऊं केला वितपशील:—राजश्री कान्होजी भोंसले राज्यांतून गेले. यांचे लेक राजश्री रायाजी भोंसले असलईत पुरातन सरं-जाम राजश्री परसोजी भोंसले याचे वेळेस जो होता तो दरोबस्त स्वस्थान देखील करून देऊं; खेरीज माळवा सुपें बारामती व दहीगांव महाल तनि मोकासे करून देऊं, येणेंप्रमाणें कलमें दोन तुम्हास देऊं केलीं आहेत. रा-जश्री स्वामींचें दर्शन झाल्यावर करून देऊं. अंतर होणार नाहीं राजेश्री स्वामींस अर्ज करून देववूं, यास अंतर करूं तरि, स्वामींचे पायांचा शपथ असे. देशमुखी कडेवळितची राजपत्र करून देववूं. हे विनंति.

[ १० ] श्री

राजश्री मुधोजी भोंसले सेनाधुरंधर गोसावी यांस

सकळ गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—

से॥ बाळाजी जनार्दन आशीर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेष विस्तारें मजकूर लिहिला त्यांत मुख्यार्थ कीं महमदइसफ याजवर ताजेखान रोहिले फौजेसुद्धां रवाना

---

१ मराठ्यांचे झेंडे भगवे असत याचें कारण 'रामदास स्वामीच्या बखरींत' १०९ पृष्ठांत सांगितलें आहे. 'धौम महाबळेश्वर वर्णन, ११९ पृ० पहा.

२ हा अक्कलकोटकर भोंसल्यांचा मूळ पुरुष. शाहू महाराजाची अक्कलकोट येथें फत्ते झाली तेव्हां कोणी आपला मुलगा शाहूच्या पायांवर घातला. त्यास शाहूनें पुत्रतुल्य मानून रंकाचा राव केला.

३ सरकार अहमदनगरचे पोटीं १० परगणे अथवा महाल होते. त्यापैकीं एकाचें नांव

४ नारायणरावास मारणारा बाप मुधो-जींनें कपटानें धरून पेशव्यांच्या कारभाऱ्या-च्या स्वाधीन स. १७७६ चे सुमारास केलें. यास कोणती शिक्षा मिळाली हे 'पेशव्यां-ची बखर' पृ० १३२ पहातां समजेल.

५ शिवनी-छपारे येथील भोंसल्यांचा सरदार

अनुक्रमणिका

केले. त्यांनीं मेहनत फार करून धरून आणून त्याचे पायांत बिडी घातली. त्यास शिरूरास आणविला आहे. तेथें पांचशे राऊत पाठऊन न्यावा, म्हणून राजश्री हरि बल्लाळ यांस लिहिले आहे त्यांचे राऊत येऊन घेऊन जावे हे प्रतीक्षा आहे म्हणून लिहिलें तें कळलें. ऐशास ताजखान रोहिले यानीं मेर्दुमीची शर्थ करून हरामखोर धरिला, फार सरस केलें.. त्यास आणावयास पांचशें राऊत पाठविले म्हणून हरि बल्लाळ यानीं लिहिलें. येथें होते त्यास राऊत शिरूरास पोंचवून त्यांचे स्वाधीन इसम मजकुरास केलाच असेल. आपले लक्ष दुसरें नाहीं म्हणून लिहिलें तरि पूर्वीपासून श्रीमंतांचा व आपला स्नेह घरोब्रा एकात्मता चालत आला. तेंच लक्ष आपलें आहे. त्याच रीतीनें येथून दुसरा विचार सहसा नाहीं. आपण मार्गाची गोष्ट, तेच करितात, हेंच फार उत्तम आहे. अलंकाराचा विषय किती परंतु लिहून पाठविलें हें उचित. रा छ० ६ रमजान. बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हें विनंती.

याच पत्राच्या अन्वयें सखाराम भगवंत यांनीं ही पत्र लिहिलें. तारीख ही छ मजकूरच आहे.

[ ११ ] श्री

## सवाई माधवराव पेशवे व रघोजी सेना साहेब सुभा यांचे सवाल + जबाब.

१. सवाल. ब्रम्हेश्वरचा[3] तह झाला तो कैलासवासी रावसाहेब[4] यांची मर्जी रखून निरोप घेतला; दोन वर्षें प्रचीत पुरवून विनंति करावी हा निश्चय होता त्या वेळेस बोलणें तसेंच राहिलें. त्यास सांप्रत, तें ऐकून काय तें सांगितलें पाहिजे. कलम १. जबाब. उचित आहे तेंच बोलावें. याप्रमाणें करार करावे.

---

१ प्रख्यात सेनापती-हरीपंत तात्या फडके

२ पराक्रम, शौर्य,

[ सवाल जबाब—टीप ]

+ हे सवाल जबाब इ. स. १७७१ चे सपटंबर महिन्यांत झाले. भोंसल्याकडून त्या साली जून महिन्यांत दिवाकर पंडित पुण्यास गेला होता, त्याच्या मार्फत हे सवाल जबाब झाले असें दिसतें.

३ ब्रम्हेश्वराजवळ भीमानदीच्या तटाकीं, कज्जकापर येथें थोरले माधवराव पेशवे व जानोजी भोंसलें यांचा गोपाळराव पटवर्धन मिरजकर याच्या मध्यस्थीनें १३ कलमांचा तह इ. स. १७६९ मार्च २९ रोजीं झाला. या तहास "कनकापुरचा तह" म्हणतात. या तहानें जानोजीस पेशव्यानें चांगला वठणीस आणिला. पेशव्याच्या अनुमतिशिवाय जानोजीनें कोणतेंही राजकारण करूं नये असें ठरलें. (ग्रां० डफचा इंग्रजी इतिहास पृ. ३३२ आवृति. ३)

४ माधवराव बल्लाळ पेशवे पंतप्रधान यांस 'रावसाहेब' म्हणत.

अनुक्रमणिका

२. *सवाल. तीर्थस्वरूप सेनाधुरंधर यांचा व नबाबाचा[1] अलजैपुरावर[2] तह झाला त्यासीं पांच वर्षे झालीं. तहांत करार कीं, रा। रघुनाथराव दादा यासीं सोडावें आणि रा। पंतप्रधान यांचा पक्ष धरावा त्याप्रमाणें अमलांत घडून आलें किंवा नाहीं हें उत्तर व्हावें. कलम-जबाब. तीर्थस्वरूप रा। राजश्री दादा साहेबांचा पक्ष सोडून सरकार लक्ष्यांत राहून वर्तणूक केली येविशीं निशा आहे. लौकिकांतही प्रसिद्ध आहे. सरकारची खातर जमा जाहली. येणेंप्रमाणें करार करावे.

३ सवाल. इंग्रज येऊन दोन महिने हुसंगाबादेवर बसले. इंग्रजांची व आपली तूट आणि कटकचे बदल खातर, आम्ही त्यांशीं स्नेहाचे रीतीनें दोन अडीच महिने दिवस घेतले. येणेंकरून चौंहींकडे एक प्रकार दिसला, परंतु येथें लक्षांत रतिमात्र अंतर झालें कीं काय येविषयींचें उत्तर झालें पाहिजे. कलम १. जबाब. येविशीं पक्की खातरजमा झाली. संदेह राहिला नाहीं. इंग्रजाकडील पत्रें दाखविलीं त्यावरून पूर्ते समजलें. येणेंप्रमाणें करार करावे.

४. सवाल.† इंग्रजांचा व सरकारचा बिघाड ; इंग्रज रा। रघुनाथराव दादा याशीं पुढें करून दौलतीस उपद्रव करूं लागले ; तेव्हां आम्ही सरकारचे लक्षांत याजमुळें कटक प्रांतास व प्रति वर्षीं १४ लक्ष रुपये द्यावे या शिवाय वीस वर्षें मकसुदों बादेस मागील बाकी आहे. यास इंग्रज पेंच बसवितील, त्यास बिघाडाचे पोटांत पेंच बसविला तरी चिंता नाहीं. सरकारची मदत असावी; समजून घेऊं. इंग्रजाचा आपला सलूख होऊन तह झाला तरी आमची वाट काय त्याची आज्ञा करावी. कलम १ जबाब कटकास इंग्रजाचा पेंच पडल्यास सरकारांतून मदत केली जाईल. येणेंप्रमाणें करार करावे.

---

* दुसऱ्याप्रतींत हा सवाल ११ वा आहे.

१ मुधोजी भोंसले.

२ निजाम अली.

३ एलिचपूर.

४ कर्नल गाडर्ड् हा इ. स. १७७८ च्या डिसेंबरच्या २ तारिखेस हुसंगाबादेस नर्मदा नदी उतरून चालता झाला. परंतु पुढें जाण्यापूर्वी त्यास मुधोजीच्या पत्राची वाट पाहत थांबावें लागलें. मुधोजीनें इंग्लिश सरकारचें म्हणणें प्रथम मान्य केलें नाहीं. पेशव्याचें वजन कमी करण्या करितां मुधोजीस सर्व मराठे लोकांचा राजा बनवावा आणि त्याच्या बळावर ढवळाढवळ करावी असा मि. हेस्टिंग याचा इरादा होता. परंत तो समूळ फसला. विठ्ठल सुन्दर यांन हा पूर्वीं असा घाट घातला होता.

† हा सवाल १२ वा दुसऱ्या प्रतींत आहे.

५ बंगाल.

५. सवाल. सर्वांचा आमचा वालीपणा ईश्वर दयेनें येथें राखिला आहे. यासी उपद्रव इंग्रज, हैदर नाईक अगर कोणी करूं लागले तरि आह्मांस ईतल्ला अगोदर दोन महिने व्हावा. जमियतीनिशीं शक्तीप्रमाणें हजर आहों. या खेरीज कोठेंही फौज पाठवा अगर आमचे सरकारची फौज आली याजबरोबर आपली फौज या ही गोष्ट नसावी, सबब घरांत भावाबंदाचे पेंच व वऱ्हाडांत नाना प्रकारचे उपद्रव व संबेलपूर आदिकरून रजवाडे, व मंडैले आदिकरून कामें, ओपाळ आदिकरून कामें बिघडून राहिलीं आहेत; याजकरितां फौज पाठवावी हें माफच असावें. केवळ दौलतीवर पेंच बसल्यास एक इशारा आला म्हणजे बेहुजूर‡ आहों. कलम १. जबाब. मातबर मसलतीस बोलाविलें जाईल, ते समयीं फौज सुद्धां तुम्ही यावें. शिवाय मसलतींत दरसाल बोलावणें होणार नाहीं. येणें प्रमाणें करार करावे.

६. सवाल.* तीर्थरूप सेनाधुरंधर याजकडून राजश्री रघुनाथरावद्दादा यानीं तेरा लक्ष रुपयांचा रोखा लिहून घेतला आहे, त्यास त्यापैकीं साडेसहा लक्ष रुपये त्यानींच माफ केले. बाकी साडेसहा लक्ष रुपये त्यानीं आम्हांजवळून घ्यावे अथवा त्यानीं माफ करावे हा जिमा ईश्वरेंच त्यांजकडे ठेविला नाहीं. तेव्हां ई[illegible]सत्ता आपणाकडेस आहे. त्यास आम्हांकडून जी वर्तण[illegible]
आहे. येविशीं काय
रुपयांचें खत रा[illegible]
लिहिणें प्राप्त
जबाब.
सबब

७. सवाल. आम्हां आपलेही पूर्ती खातरजमा झाली असली तरी दायादसंबंधी प्रकरण घरकुले घडतच असतात; त्याची नालिश सरकारांत येत असती त्यास येथून मनोधारण त्यांचे रक्षायास पत्रें जातील त्याशीं हे गोष्ट न घडावी; आमचे दायाद संबंधीं आहेत त्यांजला जागा सरकारांत न व्हावी अगर नबाब निजाम अलीखान बहादुर, व शिंदे होळकर सरदार यांजकडेस कोणी पत्रें लिहील अथवा जाईल याशी हि येविषयीं पत्रें लिहून त्याचा थारा न व्हावा; अखंड लोभ करून आम्हावर अंतरबाह्य मदतच असावी. आमचे दायादसंबंधाचीं पत्रें व राज्यकारण येईल तरि त्याचा इतल्ला आम्हांस होत असावा, आम्हाकडेस कोठीलही पत्रें अथवा राज्यकारण आलें तर त्याचा इतल्ला वरचेवर करण्यांत येईल. कलम १. जबाब. सरकारचा तुमचा स्नेह व तुम्ही सरकार लक्ष्यांत त्या पक्षीं अशा गोष्टी घडणार नाहींत. ये विशीं खातरजमा असावी. येणेंप्रमाणें करार करावे.

८. सवाल—आम्हाकडील संपूर्ण प्रांत किती, यांत वसूल काय याजपैकीं धर्म परंपरा कैलासवासी तीर्थस्वरूप बाबासाहेब व बाबासाहेब यांजपासून चालत आला आहे. किती बाकी राहिली काय, त्याजपैकीं
...प व चिरंजीव मन्या बापू आदिकरून यांजक...
...ा खर्च किती आहे, हें जाऊन
आज्ञा करावी; या खेरीज
...कृत्यावर उपयोगी
तुम्ही सर्वजाण
जावा. गेणें-

बापा दुःख परा जो देतो जें भोगितसे तो तें ॥
पेरावें बीज जसें त्याचें प्राप्त फळ तसें होतें ॥ १५ ॥
सत्य सुरुचि वदली वत्सा कीं माझीं कर्में खोटीं ॥
म्यां हतभाग्येनें धरिलासी प्रथम अभद्रीं पोटीं ॥ १६ ॥
वाढविलासी मग बारा [ ? ] तूं तंव आहितकरें स्तन्यें ॥
धन्य अतें कसें फळ होतें काय ह्मणावें अन्यें ॥ १७ ॥
मी दुर्भगा नव्हें कैसी कीं पुत्रा मातें भार्या ॥
दासी ही ह्मणतां बहु लज्जा वाटे राजा आर्या ॥ १८ ॥
जैसी मी माता तैसी च प्राज्ञ जन मतें सुरुची ॥
मजहुनि ही तुजला बहु मान्या कीं ती दयिता गुरुची ॥ १९ ॥
सत्य प्रिय हित वदली मत्सर सोडुनि तूं तें चि करीं ॥
आराधीं श्रीहरितें तो चि श्रेष्ठ वरद सुरनिकरीं[1] ॥ २० ॥
उत्तम जसा तसा भद्रासन इच्छिसि तूं जरि तरि तें ॥
प्रभुपदसारस आराधीं हित बहु भजकाचें करितें ॥ २१ ॥
ब्रह्मेंद्रादि हिं झाले प्रभुतें आराधुनि सुपदेश ॥
ऐसा सुनिति हि करी त्या ध्रुवबाळाला उपदेश ॥ २२ ॥
त्यागी करावया रोमांचित धीरजना भर्वनातें[2] ॥
ध्रुव बाळ निघे आराधाया नीरंजनाभ[3] वनातें ॥ २३ ॥
माय हि न ह्मणे ध्रुवबाळाला बहु ताप न हो राहो ॥
कीं जी शरणागति प्रभुप्रति होय शुभद होरा[4] हो ॥ २४ ॥
संसृतिपारद परम विशारद भेटे श्रीनारद या ॥
शारदयामवतीश[5] चकोरीं तेंवि करी फार दया ॥ २५ ॥
पुसुनि मुनि ह्मणे बा बाळ असें वचन कठिण सोशील ॥
तेव्हां चि तुझें ऐसें केवळ उग्र हटि नसो शील[6] ॥ २६ ॥
भुतसुहृत मानि याति शरण बुध शांतिस चि सुरभि मानी ॥
बहु दुर्लभ परमेश्वर त्यातें पावे न दुरभिमानी ॥ २७ ॥
ध्रुव बोले सांगसि जें तूं तें सत्य चि सर्व स्वामी ॥
ऐकावें त्वां वदतों कांहीं सज्जन सर्वस्त्रा मी ॥ २८ ॥
साधुनि वृत्त्युपदेशामृत हे प्यावें कविकटकांहीं ॥
न धरी सुरुचिदुरुक्तिशरशतच्छिद्र-हृदय घैंट[7] कांहीं ॥ २९ ॥

---

[1] देवांच्या समुदायांत. [2] घर. [3] विष्णु. [4] सुमुहूर्त. [5] शरच्चंद्र. [6] स्वभाव. [7] घागर.

धर्माचें तत्व असे चि न हा जाणे बाल नयाचें ॥
त्वां गुरुवरें करावें संप्रति समुचित लालन याचें ॥ ३० ॥
भगवद्दर्शन दुर्लभ हि सुलभ व्हाया जी काय किली ॥
ती तव हस्तीं आहे ऐसी कीर्ति तुझी आयकिली ॥ ३१ ॥
बहु मानावें लोकें केलें आंगउपायन तातें ॥
बहु काय वदों सदय गुरुवरा सांग उपाय नतातें ॥ ३२ ॥
परम प्रसन्न होऊनि भगवान् ज्ञानदया राशि कवी ॥
भगवध्ध्यानार्चनमंत्र सुविधि राजकुमारा शिकवी ॥ ३३ ॥
ध्रुव नमुनि ह्मणे जातों आतां मी बापा यमुनेतें ॥
भगवद्दर्शन झालें चि तुझे दिसतां पाय मुने तें ॥ ३४ ॥
जाऊनि यमुने प्राति तत्तीरीं रम्य मधुवनीं राहे ॥
आरंभी परपुरुषाराधन शिशु हि बहु श्रम साहे ॥ ३५ ॥
मुनि भूपाला भेटे राजा पूजी मुनिला विधिनें ॥
त्यातें क्कां खिन्न असें पुसिलें त्या ज्ञानदयानिधिनें ॥ ३६ ॥
कथितां वृत्त सविस्तर त्याच्या होय भर विलापाला ॥
पुत्र विरहाविषतरुच्या विधिनें विपुल भरविला पाला ॥ ३७ ॥
स्त्रीजित निर्दय निस्त्रप ऐसें स्वमुखें बहु निंदुनि घे ॥
सुतशोकांत न तो नृप आणों राहुमुखीं इंदु निघे ॥ ३८ ॥
नारद ह्मणे सुतातें शीघ्र चि सिद्धार्थ पहाशील ॥
आहे क्षेमीं देवसुरक्षित तन्मान्य महाशील ॥ ३९ ॥
मुनिवचनें चिंता सोडावी परि घडल्या अनयातें ॥
स्मरुनि अनादरुनि भीतें तो नृप चिंती तनयातें ॥ ४० ॥
पांचा वर्षांचा ध्रुव उग्रीं नियमीं चळला न दरें ॥
पहिल्या मासीं तो त्रिदिनांतीं खाय कपित्थें बदरें ॥ ४१ ॥
दुसरे मासीं द्विगुण दिनांतीं तो शीर्णें तृणपर्णें ॥
भक्षुनि चिंती प्रभुसि परिसिला होता जैसा कर्णें ॥ ४२ ॥
तिसरे मासीं त्रिगुण दिनांतीं पी केवळ तोयातें ॥
आशीर्वाद मुनीचा जो दे योगीबळ तो यातें ॥ ४३ ॥
मग तो चवथे मासीं द्वादश दिवसांतीं वातातें ॥
प्राशुनि चित्तीं चिंतीं प्रेमें चतुरानन-तातातें ॥ ४४ ॥

१ किळी (युक्ति) २ सावविला. ३ निर्लज्य. ४ कवठ. ५ बोर. ६ पाणी. ७ विष्णु.

पंचम मासीं एक पदें तो स्थाणुसम उभा राहे ॥
हृदयीं भगवन्मूर्ती तें चि न तदितर कांहीं पाहे ॥ ४५ ॥
विश्वस्वरूप हरिहुनि आपण भिन्न नसे या भावें ॥
धरिला ध्रुवें समाधि असें चि ध्यान वराया यावें ॥ ४६ ॥
त्याच्या प्राणनिरोधें झाला विश्वप्राणनिरोध ॥
भ्याले लोक सलोकप त्यांशि न लागे कारणशोध ॥ ४७ ॥
व्यसनीं सर्व हि लोकेश शरण गेले लक्ष्मीपतितें ॥
यन्नामें शुचि व्हावें चलन न होतां पैक्ष्मीं पतितें ॥ ४८ ॥
ते प्रभुसि ह्मणति आह्मांसि तुझा मात्र असे विश्वास ॥
रक्षीं सदया प्राणनिरोधा पासुनि या विश्वास ॥ ४९ ॥
दे अभय प्रभु सांगे कारण जें कांहीं न कळे तें ॥
जा स्वस्थ ह्मणे पावविलें मुख हें कां हीनकळेतें ॥ ५० ॥
लोकेश स्वस्थानीं धाडुनि जगदीश्वर मग पैतें ॥
न लवे तोंचि मधुवनीं आला समधिष्ठुनि खगपातें ॥ ५१ ॥
राहे पुढें उभा परमेश्वर परि तो ध्रुव पाहेना ॥
कीं अंत:स्फुरितप्रभुमूर्तिवियोग क्षण साहेना ॥ ५२ ॥
त्या ध्रुवहृद्गतनिजमूर्तीतें तो प्रभुवर आकर्षी ॥
व्हाया प्रमुदित साधु श्रोते सुकवि ध्रुवैं नाकर्षी ॥ ५३ ॥
हृदयीं भगवन्मूर्ति न दिसतां पावे व्युत्थानातें ॥
ध्रुव गडबडला चुकला शोधी बाळ जसा थानातें ॥ ५४ ॥
नेत्रें उघडीं घाबरला तो ध्रुव सहसा जों पाहे ॥
तों आंत जशी तसि बाहेर प्रभूमूर्ति उभी राहे ॥ ५५ ॥
भी परि सुनीतिसुत दंडा परि पडला करि अंजलि ही ॥
कीं बहु भाग्य ललाटी श्रीगुरुनारद करकंज लिहीं ॥ ५६ ॥
स्वगुरुगुरूचि शिकवुं ह्मणे जाणों शिकवि न या स्ववन मुनी ॥
स्तुति वांछा धरुनि उगा चि पुढें राहे यास्तव नमुनी ॥ ५७ ॥
ध्रुवमति जाड्य ब्रह्ममयदरें स्पर्शुनि गाल हरी तें ॥
वात्सल्य असें परिसुनि जन हो हर्षुनि गाल हरीतें ॥ ५८ ॥
जागविली निजली होती त्या बाळाची जी वाचा ॥
बोध दिला ऐसा लाजावा ज्या महिमा जीवाचा ॥ ५९ ॥

---

१ खुंट. २ डोळ्याच्या पापण्या. ३ निश्चयेंकरून. ४ प्रतिरोध. ५ करकमळ. ६ बृहस्पतीचा.

अनुक्रमणिका

प्रभुनें शिशुसि शिकविलें जैसें निजवर्णन वेदास ॥
वाट तो उच्चारी स्तवनीं शुचि वर्ण नवे दास ॥ ६० ॥
बाळ मुखींचीं जरि अव्यक्तें अक्षररूपें साधीं ॥
केवळ अमृत चि होती वत्सल गुरुजनकर्णीं आधीं ॥ ६१ ॥
परमानुग्रह करुनि शिकविलें प्रभुनें भाषण मग तें ॥
किति वर्णावें अमृत कसें हो त्या सूक्ति पुढें तगतें ॥ ६२ ॥
वाजविला वेणु तसा किंवा बहु शिक्षित हा शुकसा ॥
प्रभुला प्रमुदित मग न करील ध्रुव बाळक आशु कसा ॥ ६३ ॥
भगवान् प्रसन्न होउनि बोले दिधलें तुजला पद तें ॥
सर्वपदश्रेष्ठ असें वत्सा विश्व जयातें वदतें ॥ ६४ ॥
ज्यातें प्रदक्षिणा सप्तर्षि ग्रहमंडळ करि वेढी ॥
जे ज्योतिश्चक्रीं वृषचक्रीं जेंवि विराजे मेढी[1] ॥ ६५ ॥
आधीं वत्सा तूं येथुनि जा निजजनकाच्या भवनीं ॥
जातां तपोवनाप्रति देइल तुजला राजा अवनी ॥ ६६ ॥
छत्तिस सहस्र वर्षें करिसिल अवनीच्या अवनातें ॥
नित्य मम भुजा परि करितील प्रकृति तव स्तवनातें ॥ ६७ ॥
उत्तम[2] मरेल मृगयेंत सुरुचि दवदहनांत जळेल ॥
वत्सा हें न टळेल कदापि त्वत्कीर्ति हि न मळेल ॥ ६८ ॥
बहुलक्षिण यज्ञाहीं मातें यजुनि सुखें वससील ॥
मग तूं माझ्या सर्वामर मुनिवंद्य पदीं बससील ॥ ६९ ॥
ऐसा अत्यद्भुत वर देवुनि गुप्त प्रभुवर झाला ॥
मग नातिप्रीत मनें तो ध्रुव तात-पुरी प्रति आला ॥ ७० ॥
कर जोडुनि वार्ताहर[3] सांगे ध्रुव आला हे वार्ता ॥
ती राजाला झाली जैसी वृष्टि सुधेची आर्ता ॥ ७१ ॥
वार्ताहरासि बहु मोलाचा मणिहार दिला भूपें ॥
रत्नाकरें प्रसन्नें रत्नें द्यावीं उदकें कूपें ॥ ७२ ॥
नारद मुनिच्या विश्वासें ती वार्ता साची वाटे ॥
शोक सुतागमनें जेंवि घटनतेजें सागर आटे ॥ ७३ ॥
राजा भार्यापौरामात्यां सह सामोरा गेला ॥
तें स्वनिर्यति वरि तेंवि सुरुचिवरि न ध्रुव तो रागेला ॥ ७४ ॥

---

१ मेट. २ साधनभाक. ३ हेर. ४ स्वप्रारब्धावर.

गुरुस सुरुचिस सुनितिस वंदुनि भेटुनि निववी अंगें ॥
कीं आलें तापहरत्व श्रीमुनिभगवत्पदसंगें ॥ ७५ ॥
सादर सुरुचि निरखि दिसलें न तदानन सा महिने तें ॥
ध्रुव मानिं ह्मणे अशा पदवीस न दान न साम हि नेतें ॥ ७६ ॥
विरहद होउनि योगद झाला त्या यादा अर्णव तो ॥
भगवज्जनसंगज परमोत्सव सांग कसा वर्णवतो ॥ ७७ ॥
पुरजन न वर्णवे वर्णवतो त्याचा तात कसा हो ॥
ध्रुव ह्मणतां चंद्र चकोर असे कीं घन चातक साहो ॥ ७८ ॥
नेला नगरीं तो ध्रुव गाजत वाजत मिरवित तातें ॥
माथां तत्कीर्तिं वितानैतें त्रिभुवन मिरवि ततैतें ॥ ७९ ॥
वर्णिति अत्यद्भुत भाग्य सदा सुरपन्नग राजाचें ॥
अमृताचे वर्षतसे निववी यश तन्नगरा ज्याचें ॥ ८० ॥
योग्य दशा पुत्राची राज्या त्यागा आपुलि पाहे ॥
मग भगवद्भक्तीं सत्पात्रीं राजा स्वश्री वाहे ॥ ८१ ॥
कृतकृत्य चि नृप झाला रत भगवंतीं सुत पाहूनीं ॥
गेलातपोवना कीं अधिक न अंतीं सुतपाहूनि ॥ ८२ ॥
वाटेल कसें परम पद प्रद तप कविला सामान्य ॥
हें टाकुनि होय जडाचि नेणुनि सपैक विलासा मान्य ॥ ८३ ॥
पावावि ताताच्या प्रकृतीचें मानस जेंवि सराला ॥
तें विसरविं हंसकुळाकरवी मानस जेंवि सराला ॥ ८४ ॥
तो उत्तम मृगयेतें गेला तेथें वधिला यक्षें ॥
व्हायाचें तें होय चि कोणें भावि चुकाविलें दक्षें ॥ ८५ ॥
गेहीं सुतशोक परम दुःसह ह्मणूनि सुरुचि ती गहनीं ॥
शिरली सद्यः स्वतनुवियोगें व्हाया सुख दवदहनीं ॥ ८६ ॥
क्षोभे ध्रुव बहु ज्याच्या चक्रध्वनिनें अरि तापावे ॥
त्या चढुनि रथीं यक्षपुरा षढहितमदहारिता पावे ॥ ८७ ॥
आले त्रयोदशायुत धावुनि गुह्यक राक्षस यक्ष ॥
तींतीं बाणांनीं एकैका विंधी ध्रुव रणदक्ष ॥ ८८ ॥
एकें एकें सा सा ऐसे त्यांहीं शर बहु लक्ष ॥
पाठविले तेव्हां ध्रुव झाला दवदहन चि ते कक्ष ॥ ८९ ॥
प्रकट करिति बहु दुःसह जाणुनि यातें ते परसाया ॥

---

१ जळचर. २ समुद्र. ३ छत. ४ विस्तृत. ५ गोडी रहित. ६ चतुर. ७ गवत.

नारायणास्त्र योजी जें ध्रुव भ्याल्या त्या परसा या ॥ ९० ॥
गुह्यकपुर मर्दुनि ध्रुवानें मर्दाया अलकेला ॥
त्या राक्षसगुह्यकयक्षांच्या पति वरि ही चल केला ॥ ९१ ॥
तेव्हां त्याचा त्यासि पितामह मनु भेटुनिया वारि ॥
तत्क्षोभा शमवि सदुक्त दवा घनमुक्त जसें वारि ॥ ९२ ॥
एकाच्या अपराधें केला बहुतांचा घात कसा ॥
तूं प्रभुपदनखचंद्रामृतरस पीतां कीं चातकसा ॥ ९३ ॥
न क्षोभाया करि तो अंजलि ईश्वरबंधु प्रति मी ॥
त्या मेघें वर्षावें या ममवंशीं अधुप्रीतिमी ॥ ९४ ॥
हरिभिन्न असे ज्याला कोणी जाता न वदे हर तो ॥
न क्षोभो तद्भक्तजनाच्या भजनीं तव देह रतो ॥ ९५ ॥
निजपौत्रातें स्वायंभुव मनु सांगुनि ऐसें गेला ॥
ध्रुवभूपें चापन्यास करुनि अंजळि हरासि केला ॥ ९६ ॥
शिवसख हि तया दर्शन नेउनि पाहुनि हर्षें डोले ॥
लोलेक्षण तद्रूपीं होउन बहु मधुर असें बोले ॥ ९७ ॥
साधो प्रसन्न झालों वदला जें स्वायंभूमनु तें ॥
जनुतें सफळ कराया केलें मान्य तुवां सुजनंनुतें ॥ ९८ ॥
यक्षनिमित्त चि उत्तमनिधनीं यक्षवधीं तूं हि तसा ॥
काळाचें तें करणें राजा तो चि अहितेंसाहि तसा ॥ ९९ ॥
बा ध्रुवराजा मजपासीं त्या अभिमत वर मागावा ॥
हारिभक्ता तव महिमा व्हाया शुचिता परमा गावा ॥ १०० ॥
ध्रुव हें मागे मज शंभुभजकमुकुटमणे वर दे हा ॥
मन्मतिस म्हणो स्वपदीं जेंवि श्रीस म्हणे देव रहा ॥ १०१ ॥
तो धनप तथास्तु असें वदला मग अंतर्हित झाला ॥
या परिस पाहुनि नय सुयश ध्रुव निजनगरा आला ॥ १०२ ॥
षटत्रिंशद्वर्षसहस्र स्त्र प्रकृतीस सुख प्राज्य ॥
देउनि मग उत्कल नामक निज तनुजातें दे राज्य ॥ १०३ ॥
श्रीबदरिकाश्रमीं ध्रुव जाऊनि हरितें चिंतित राहे ॥
नंदसुनंदप्रभुचे पार्षद आले त्यांतें पाहे ॥ १०४ ॥

---

१ कुबेरपुरी. २ आड बिहिरे. ३ सुजनांनीं स्तविलेला. ४ दुःख सहन करणारा. ५ प्रजेला. ६ दूत.

त्यांहीं दिव्यविमानीं वाहुनि विष्णुपदा प्रति नेला ॥
ऐसा राजा ध्रुव जगदीशें उत्तमपदभाक् केला ॥ १०५ ॥
देवर्षि ह्मणे झाला बाळ हि धन्य सुनीतिसुत पहा ॥
प्रभु न ह्मणों दे दीना शिकउनि शीघ्र सुनीति सुतप हा ॥ १०६ ॥
राम दयाघन भक्तमयूरप्रियाहित सर्व हि करितो ॥
दर्शन देउनि जें बहु दुःसह तें तापत्रय हरितो ॥ १०७ ॥

समाप्त.

---

## प्रश्नोत्तर-रत्न-माला.

श्रीशंकरभगवत्पदरचित प्रश्नोत्तराख्य मणिमाला ।
प्राकृत शब्दगुणीं मी रचितों बुध हो परंतु प्रतिपाला ॥ १ ॥
कंठींच असों द्या हो हे मणिमाला अलभ्य परि साची ।
प्रेमें सुलभचि रसिकां कीर्ति इणें जिंकिली च परिसाची ॥ २ ॥
प्रश्नोत्तरमणिमाला हे केवळ होय हो सुधाधारा ।
खळ राहुलाचि न जिरे त्यांस जिरे भजति जे बुधाधारा ॥ ३ ॥
श्रीशंकरें दिली हे भजकां रसिकांसि कामदा कपिला ।
श्रीरामें जसि गाया प्याया निज कीर्ति त्या महाकपिलों ॥ ४ ॥
कोण न शोभे विमल प्रश्नोत्तररत्नमालिकाधारी ।
दृष्टा दृष्टार्थांचा स्वसाधनीं जो सुजाण संसारीं ॥ ५ ॥
सच्छिष्य बोधरीती करुनि श्रीशंकरें दयानिधिनें ।
ग्राह्याग्राह्य पदार्थ स्पष्ट चि केले असे अशा विधिनें ॥ ६ ॥
स्वामी काय ग्राह्य स्वमुखें सांगा करा दया पूर्ण ।
शिष्या स्वीकारावें गुरुवचन प्रणतिपूर्व अति तूर्ण ॥ ७ ॥
काय त्यागावें तें स्वामी सांगा अजाणत्यास मज ॥
शिष्या अकार्य सारें टाकावें हें मनीं बरें समज ॥ ८ ॥
स्वामी कोण गुरू हें सांगा होईन संशयान्मुक्त ॥
शिष्या जो तत्त्वज्ञ प्राणिहिता कारणें सदोद्युक्त ॥ ९ ॥

---

१ हाय. २ शब्दरूपी दोन्यांत. ३ ज्ञान्यांचा आश्रय. ४ कामधेनु. ५ मारुतिला. ६ दृष्टादृष्टार्थांच्या साधनिं जो तो चि कुशळ संसारीं असाही पाठ आहे. ७ रीतीनें. ८ नमस्कारपूर्वक. ९ सत्वर.



अनुक्रमणिका

